**नाधवडे लघु पाटबंधारे प्रकल्प ता. वैभववाडी, जि. सिंधूदूर्ग या प्रकल्पाचे रु.१०७९८.७८ लक्ष किंमतीच्या सुधारित अंदाजपत्रकास व्दितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. लपायो -२०१९/(प्र. क्र.१५७)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०९ मार्च, २०२३

**पहावे :-**

१) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ निर्णय क्र. कोपाविम/तां.३/१२३७ दि.०६/०५/२००५.

२) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोंपाविम /तां-३/नाधवडे द्विसुप्रमा/ २२४६ /सन २०१९, दिनांक २८/०६/२०१९

३) वित्त विभागाचे पत्र क्र. व्यअस-२०२१/प्र.क्र.१७५/अर्थ-२ दि.०६/०१/२०२२ चे पत्र व सहपत्र

**प्रस्तावना:-**

नाधवडे लघु पाटबंधारे प्रकल्प हा सिंधुदुर्ग जिल्ह्याच्या वैभववाडी तालुक्यातील नाधवडे गावाजवळ स्थानिक नाल्यावर बांधण्यात येत आहे. सदर प्रकल्प कोकण पाटबंधारे विकास महामंडळ अंतर्गत "उर्वरीत महाराष्ट्र" या प्रदेशांतर्गत आहे. या प्रकल्पाचा एकूण पाणीसाठा ८.२२ दलघमी असून या प्रकल्पाद्वारे वैभववाडी तालुक्यातील नाधवडे व सरदारवाडी गावातील ४९८ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळणार आहे.

सदर योजनेस संदर्भाधिन क्र.१ येथील दि. ०६/०५/२००५ च्या कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे निर्णया अन्वये प्रादेशिक दरसूची सन २००३-०४ नुसार रु. १२९४.५६ लक्ष रकमेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या सन २०१७-१८ च्या दरसुचीवर आधारीत रु. १०७९८.७८ लक्ष किंमतीच्या व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाबाबत, राज्य तांत्रिक सल्लागार समिती -२ पुणे च्या दि. २२/०३/२०१९ रोजी झालेल्या २८ व्या बैठकीत छाननी अहवालातील १ ते २७ मुद्दे विचारात घेण्याच्या अधीन राहून, समितीकडून शिफारस करण्यात आली आहे.

सदरचा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या दि. १६ डिसेंबर २०२१ च्या बैठकीत ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीच्या शिफारशीनुसार सदरचा प्रस्ताव मंत्रीमंडळाच्या दि. १७/११/२०२२ च्या बैठकीत मान्यतेस्तव ठेवण्यात आला होता. सद्य:स्थिती, दरसूचीतल बदल, नवीन भूसंपादन कायदा, भूसंपादन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील फेरबदल, व्याप्ती बदल, गौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादी किंमतवाढीची कारणमिमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन मा. मंत्रीमंडळाने नाधवडे लघु पाटंबधारे योजना, ता. वैभववाडी, जि. सिंधुदुर्ग या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु. १०७९८.७८ लक्ष किंमतीस द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय सदर बैठकीत घेतला आहे. त्यास अनुसरून शासन पुढील आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

नाधवडे लघु पाटबधारे प्रकल्प, ता. वैभववाडी, जि. सिंधुदुर्ग या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१७-१८ वर आधारित रु. १०७९८.७८ लक्ष (अक्षरी रुपये दहा हजार सातशे अठ्याण्णव लक्ष, अठ्यात्तर हजार फक्त) इतक्या किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी एकूण रु.९६६६.४० लक्ष (अक्षरी रुपये नऊ हजार सहाशे सहासष्ट लक्ष चाळीस हजार फक्त) व अनुषंगिक खर्च रु. ११३२.३८ लक्ष (अक्षरी रुपये एक हजार एकशे बत्तीस लक्ष अडतीस हजार फक्त)) खालील अटींच्या अधीन राहून द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतुदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

२) "नाधवडे लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.वैभववाडी, जि. सिंधुदुर्ग" या प्रकल्पाची द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे प्रकल्प कार्यान्वित करण्याच्या विविध टप्प्यांवर क्षेत्रीय अधिकाऱ्यांनी घेतलेल्या विविध निर्णयांस व क्षेत्रीय अनियमितता झाली असल्यास अशा अनियमिततेस सहमती असल्याचे गृहीत धरता येणार नाही. तसेच प्रकरणाची तपासणी त्यावेळच्या क्षेत्रीय कार्यालयाची राहील .

३) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरणे इत्यादींची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय कार्यालयांची राहील.

४) द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहोचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.

५) संपूर्ण प्रकल्प हा द्वितीय सुधारीत प्रशासकीस मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

६) सदरहू प्रकल्पाच्या उंचीवाढीस प्रशासकीय मान्यता प्राप्त नसताना खर्च करणे वित्तीय अनियमितता झाली असल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी क्षेत्रिय कार्यालंयाची राहील. या संदर्भात संबंधीतावर जबाबदारी निश्चितीची कारवाई करण्याचे अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

७) सदर प्रकल्पाची उंची वाढ व गाभा भराव या करीता लागणाऱ्या आर्थिक दायित्वास सक्षम प्राधीकरणाची मंजूरी घेण्यात आली नसल्यामुळे संबंधीतांवर जबाबदारी निश्चितीची कारवाई करण्याच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

८) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च होणार नाही याची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

९) सदर प्रकल्पासंदर्भात अधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतेही नियमबाह्य कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अश्या कोणत्याही बाबींना या आदेशान्वये सहमती दिली आहे, असे ग्राह्य धरण्यात येऊ नये.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (१), सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २१८/२०२१ /का-१४३४, दिनांक ०२/१२/२०२१ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२९/२०२१/व्यय-१२, दिनांक १५/१२/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक १७.११.२०२२ रोजी झालेल्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली द्वितीय सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २४७ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३०९१८०९५०८९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.09 18:17:08 +05'30'

(अमोल फुंदे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव, मुंबई

३. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय यांचे प्रधान सचिव, मुंबई
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
९. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
१०. जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग
११. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१२. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षितता, नाशिक.
१३. मुख्य अभियंता (द व प्र) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
१६. उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१७. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१८. अधीक्षक अभियंता, दक्षिण कोंकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, ओरोस, सिंधुदूर्गनगरी.
१९. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२०. खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ).

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र. लपायो -२०१९/(प्र. क्र.१५७)/खारभूमी, दिनांक : ०९ मार्च, २०२३ चे परिशिष्ट)

**नाधवडे लघु पाटंबधारे प्रकल्प, ता.वैभववाडी, जि. सिंधुदुर्ग द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूदी**

| अ.क्र. | उपशिर्ष | द्वितीय सुप्रमा नुसार तरतुद (दरसूची सन २०१७-१८) ( रू. लक्ष) |
|---|---|---|
| अ) शिर्ष कामे | | |
| १. | अे - प्राथमिक | २७.४९ |
| २. | बी - भूसंपादन | ८८२.८७ |
| ३ | सी - कामे | |
| | मुख्य धरण | ५८८५.८४ |
| | सांडवा | १०२६.१८ |
| ४ | डी - विमोचक | २७६.२८ |
| ५ | एम - वृक्षारोपण | ३.२७ |
| ६ | ओ - संकीर्ण | ४.३६ |
| ७ | पी - देखभाल | ७१.८८ |
| ८ | आर - रस्ते | १३६.०३ |
| | **एकूण शीर्षकामे (अ)** | **८३१४.२०** |
| ब) कालवे व वितरण व्यवस्था | | |
| १ | अे - प्राथमिक | १४.८६ |
| २ | बी - भूसंपादन | १७६.७८ |
| ३ | डी - विमोचक | ३.५९ |
| ४ | इ-प्रपात | ०.६३ |
| ५ | एफ- आरएचटी कामे | ११९.८१ |
| ६ | जी-पूल | १३.०० |
| ७ | एच-निकासी | ३.६१ |
| ८ | एल- मातीकाम | १४०.७४ |
| ९ | बंदिस्त नलिका वितरण प्रणाली | ८५५.७३ |
| १० | एम - वृक्षारोपण | १.९६ |
| ११ | ओ - संकीर्ण | ०.०६ |
| १२ | पी - देखभाल | ११.३७ |
| १३ | यु- वितरिका / CAD कामे | १०.०६ |
| | **एकूण कालवे व वितरण व्यवस्था (ब)** | **१३५२.२०** |
| | **एकूण कामे (अ+ब)** | **९६६६.४०** |
| **क** | **आस्थापना, संयंत्रे व इतर खर्च** | **११३२.३८** |
| | **एकूण किंमत(अ+ब+क)** | **१०७९८.७८** |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.09 18:17:23 +05'30'

**( अमोल फुंदे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रकल्पाची ठळक वैशिष्ट्ये :-**

| | | |
|---|---|---|
| १. | नाधवडे प्रकल्पाची सिंचन क्षमता :- | ४९८ हेक्टर |
| २. | प्रकल्पाचा पाणीसाठा :- | ८.२२ द.ल.घ.मी |
| ३. | लाभव्यय गुणोत्तर :- | १.३९ (मापदंड १ पेक्षा अधिक) प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ४. | आर्थिक परतावा दर :- | १३.८१ % ( मापदंड १२ % पेक्षा अधिक) प्रकल्प मापदंडात बसतो. |
| ५. | पाणीसाठा किंमत :- | रू. १,३१,३७२/- प्रति संघमी (प्रचलित मापदंड रू १,७६,७२० पेक्षा कमी) प्रकल्प मापदंडात बसतो. |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.09 18:17:36 +05'30'

**( अमोल फुंदे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन